**महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांच्या अधिपत्याखालील हातकागद संस्था, पुणे येथील प्रशिक्षण विभागातील कर्मचा-यांना ५ वा व ६ वा वेतन आयोग लागू करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक केव्हीबी - २००५/ (प्र.क्र.७३७६)/उद्योग-६**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- ०१ जुलै, २०११.**

**वाचा :-** १) शासन निर्णय क्रमांक केव्हीबी-१०८९/३०८१७१/(४७६२)/उद्योग-५, दिनांक ८डिसेंबर, १९८९.
२) शासन निर्णय क्रमांक केव्हीबी-२००४/(७२५१)/उद्योग-६, दिनांक २५ जून, २००४.
३) शासन निर्णय क्रमांक केव्हीबी-२००९/प्र.क्र.१९३/उद्योग-६, दिनांक ६ मार्च, २०१०.

**प्रस्तावना :-** महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांच्या अधिपत्याखालील हातकागद संस्था, पुणे येथील प्रशिक्षण विभागातील ७ पदांना शा.नि.दिनांक ८ डिसेंबर, १९८९ अन्वये महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, १९८८ च्या तरतुदीनुसार दिनांक १ जानेवारी १९८६ पासून सुधारित वेतनश्रेणी मंजूर करण्यास मान्यता देण्यात आली होती. त्यानंतर महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, १९९८ तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २००६ च्या तरतुदी महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळाच्या अधिपत्याखालील हातकागद संस्था, पुणे यांच्या प्रशिक्षण विभागातील कर्मचा-यांना लागू करण्यात आल्या नव्हत्या. त्यामुळे हातकागद संस्था, पुणे येथील प्रशिक्षण विभागातील ७ पदांना महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, १९९८ व महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २००६ मधील तरतुदी लागू करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या अखत्यारीतील महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांच्या अधिपत्याखालील हातकागद संस्था, पुणे येथील प्रशिक्षण विभागातील सोबतच्या परिशिष्टामधील ७ पदांना महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, १९९८ व महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २००६ मधील तरतुदी अनुक्रमे दिनांक १ एप्रिल, २००४ पासून व १ एप्रिल, २००९ पासून लागू करण्यास शासनाने मान्यता दिली आहे.

२. शासन असेही आदेश देत आहे की, शासन निर्णय दिनांक २५ जून, २००४ मधील परिच्छेद-२ व ३ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती आणि शासन निर्णय दिनांक ६ मार्च, २०१० च्या परिच्छेद २ व ३

कृ.मा.प. ....

मधील अटी व शर्ती या ७ पदांना देखील लागू राहतील, तसेच राज्य शासकीय कर्मचा-यांना वेळोवेळी लागू करण्यात येणारे महागाई भत्ता, घरभाडे भत्ता, स्थानिक शहर भत्ता व प्रवास भत्ता याबाबतचे आदेश ज्या तारखेला महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळाच्या कर्मचा-यांना लागू होतील त्या त्या दिनांकापासून हातकागद संस्थेमधील प्रशिक्षण विभागातील कर्मचा-यांना देखील लागू होतील.

३. हातकागद संस्था, पुणे येथील प्रशिक्षण विभागाच्या ७ पदांना महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, १९९८ व महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २००६ लागू केल्यामुळे होणारा खर्च हा " मागणी क्रमांक के-७, २८५१ ग्रामोद्योग व लघुउद्योग (००) १०५, खादी व ग्रामोद्योग - (००) (०१) खादी व ग्रामोद्योग मंडळाला सहाय्यक अनुदान (२८५१ ०५८ ५) ३६, सहाय्यक अनुदान (वेतन) " या लेखाशिर्षाखालील सन २०११-१२ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व तो त्याच लेखार्शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १८३/ २०११/ व्यय-१६, दिनांक २७ जून, २०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०११०७०११२३७३२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(मोहन पांढरकामे)
शासनाचे अवर सचिव

प्रत :-

(१) विकास आयुक्त(उद्योग) उद्योग संचालनालय, मुंबई.
(२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ,मुंबई.
(३) अर्थ सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.
(४) महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञयेता/लेखापरीक्षा) मुंबई.
(५) महालेखापाल,महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञयेता/लेखापरीक्षा) नागपूर.
(६) महालेखापाल (पडताळणी) बाहय लेखापरीक्षा विभाग,मुंबई.
(७) लेखा अधिकारी, उद्योग संचालनालय, मुंबई.
(८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
(९) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
(१०) वित्त विभाग (व्यय-१६/सेवा-९/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
(११) कक्ष अधिकारी (प्रशासन-१) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ३२.
(१२) निवड नस्ती, उद्योग-६.

**शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्रमांक : केव्हीबी - २००५/ (प्र.क्र.७३७६) / उद्योग-६ दिनांक ०१ जुलै, २०११ सोबतचे परिशिष्ट**

**महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांच्या अधिपत्याखालील हातकागद संस्था, पुणे येथील ७ पदांना पाचव्या व सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार अनुज्ञेय सुधारित वेतनश्रेणी**

| अ.क्र. | पदनाम | चौथ्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार दिनांक ०१.०१.१९८६ पासून अनुज्ञेय वेतनश्रेणी | पाचव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार दिनांक ०१.०४.२००४ पासून अनुज्ञेय वेतनश्रेणी | सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार दिनांक ०१.०४.२००९ पासून अनुज्ञेय वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | ज्येष्ठ व्याख्याता | रुपये १६४०-६०-२६००- द.रो. - ७५-२९०० | रुपये ५५००- १७५ - ९००० | रुपये ९३००-३४८०० ग्रेडवेतन ४३०० |
| २ | कनिष्ठ व्याख्याता | रुपये १४००-४०-१८००- द.रो. - ५०-२३०० | रुपये ४५००-१२५- ७०००. | रुपये ५२००-२०२०० ग्रेडवेतन २८०० |
| ३ | लघुलेखक | रुपये १४००-४०-१६००-५०- २३००- द.रो.-६०-२६०० | रुपये ५०००-१५०- ८००० | रुपये ९३००-३४८०० ग्रेडवेतन ४२०० |
| ४ | निर्देशक | रुपये १२००-३०-१५६०- द.रो. - ४०-२०४० | रुपये ४०००-१००- ६००० | रुपये ५२००-२०२०० ग्रेडवेतन २४०० |
| ५. | कनिष्ठ सहायक | रुपये ९५०-२०-११५०- द.रो. - २५-१५०० | रुपये ३०५०-७५- ३९५०-८०-४५९० | रुपये ५२००-२०२०० ग्रेडवेतन १९०० |
| ६ | पायलट प्लॅन्ट ऑपरेटर | रुपये ७५०-१२-८७०- द.रो. - १४-९४० | रुपये २५५०-५५- २६६०-६०-३२०० | रुपये ४४४०-७४४० ग्रेडवेतन १३०० |
| ७. | माळी / रखवालदार | रुपये ७५०-१२-८७०- द.रो. - १४-९४० | रुपये २५५०-५५- २६६०-६०-३२०० | रुपये ४४४०-७४४० ग्रेडवेतन १३०० |

**( मोहन पांढरकामे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**